अनुसूचित जाती/नवबौध्द शेतक-यांना सहकारी साखर कारखान्याचे भाग खरेदीसाठी अनुदान व कर्ज वितरणाबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : ससाका-२०१७/प्र.क्र.५८/३-स,**
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २५ मार्च, २०१७.

**वाचा** :-

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका-१०२०००/९७७३/प्र.क्र.२६०/३स, दि. ७ जून, २००४.
२) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाचे पत्र क्र. विघयो २०१५/प्र.क्र. १८७/विघयो, दिनांक ०५ मार्च, २०१६.
३) वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं २०१५/प्र.क्र. ८५/अर्थ-३, दि.१७ एप्रिल, २०१५ व २०.०४.२०१६.
४) वित्त विभागाचे परिपत्रक क्र. संकिर्ण २०१६/प्र.क्र. ३१/कोषा.प्रशा.५, दि.१०.५.२०१६.
५) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका २०१५/प्र.क्र.३५/३-स, दि. ३०.११.२०१५.
६) साखर आयुक्तालयाचे पत्र क्र. विकास १/विघयो/अनु.नव./तरतुदी/१६-१७/ ५८७/२०१६ दिनांक २६ सप्टेंबर,२०१६ व दिनांक १०.०१.२०१७.
७) शासन निर्णय क्रमांक: ससाका-२०१५/प्र.क्र.३५/३-स, दि.३०.११.२०१५.

**प्रस्तावना :-**

राज्य शासनामार्फत विशेष घटक योजनेंतर्गत सहकारी साखर कारखान्याचे भाग खरेदी करण्यासाठी अनुसूचित जाती व नवबौध्द शेतक-यांना अर्थसहाय्य योजना राबविण्यात येते. या योजनेंतर्गत सहकारी साखर कारखान्याचे भाग खरेदी करण्यासाठी अनुसूचित जाती व नवबौध्द शेतक-यांना भागाच्या किंमतीच्या ५०% रक्कम बिनव्याजी कर्ज व ५०% रक्कम अनुदान म्हणून मंजूर करण्यात येते.

सदर योजना सन २०१६-१७ मध्ये राज्यात राबविण्यासाठी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने अनुदान व कर्ज यासाठी प्रत्येकी रक्कम रु.२९,५५,०००/- (अक्षरी रुपये एकोणतीस लाख पंचावन्न हजार फक्त) नियतव्यय मंजूर झाल्याचे संदर्भाधिन अ.क्र. ६ च्या पत्रान्वये कळविले आहे. वित्त विभागाच्या दि.१७ एप्रिल, २०१५ व दिनांक २० एप्रिल, २०१६ च्या परिपत्रकान्वये सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या जिल्हा वार्षिक योजनेच्या तरतूदी १००% वितरीत करण्यास अनुमती दिलेली आहे. साखर आयुक्त यांनी सन २०१५-१६ मधील मंजरू तरतूदीमधून अनुदान व कर्ज या दोन्ही योजनांसाठी प्रत्येकी रक्कम रु. १२,३०,०००/-(अक्षरी रुपये बारा लाख तीस हजार फक्त) मंजूर करण्याची विनंती संदर्भाधीन अ.क्र.६ च्या पत्रान्वये केलेली आहे. तथापि, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभागाच्या दि.०५.०३.२०१६ रोजीच्या जिल्हा निहाय वाटपाच्या अनुषंगाने रु. १२,२५,५००/- (अक्षरी रुपये बारा लाख पंचवीस हजार पाचशे फक्त) इतकी रक्कम पात्र होते. सदर रक्कम वितरीत करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

अनुसूचित जाती/नवबौध्द शेतक-यांना सहकारी साखर कारखान्याचे भाग खरेदी करण्यासाठी अनुदान व कर्ज देण्याची विशेष घटक योजना सन २०१६-१७ मध्ये राज्यात राबविण्यासाठी प्रत्येकी रु.१२,२५,५००/-(अक्षरी रुपये बारा लाख पंचावीस हजार पाचशे फक्त) नियतव्ययाच्या कार्यक्रमास या आदेशान्वये शासनाची प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

**०२.** या योजनेंतर्गत अनुदान व कर्ज यासाठी प्रत्येकी वितरित करण्यात येत असलेला रु. १२,२५,५००/- (अक्षरी रुपये बारा लाख पंचवीस हजार पाचशे फक्त) निधीचा खर्च सन २०१६-१७ करिता खालील लेखाशिर्षांतर्गत मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

अनुदान

लेखाशिर्ष:-
मागणी क्रमांक व्ही-२,
२४२५- सहकार,
(०३) सहकारी साखर कारखाने, (दोन) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना,
(०३)(०८) अनुसूचित जातीतील व्यक्तींसाठी विशेष घटक योजना-साखर कारखान्यांचे शेअर खरेदी करण्यासाठी अनुसूचित जातींना व नवबौध्दांना अर्थसहाय्य (२४२५ ०५८६)
३३-अर्थसहाय्य

कर्ज

मागणी क्रमांक व्ही-५,
६४२५- सहकारासाठी कर्जे,
(०३)सहकारी साखर कारखाने,
पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना
(०३)(०४) सहकारी साखर कारखान्यांचे शेअर्स खरेदी करण्यासाठी अनुसूचित जातीच्या व नवबौध्द सदस्यांना कर्जे (वि.घ.यो.) (६४२५ ०१६२)
५५-कर्जे व आगाऊ रकमा

**०३.** या योजनेंतर्गत अनुसूचित जाती/नवबौध्द शेतक-यांना सहकारी साखर कारखान्याचे भाग खरेदी करण्यासाठी अनुदान व कर्ज यासाठी जिल्हानिहाय तरतूद सोबत जोडलेल्या परिशिष्टामध्ये नमूद करण्यात आल्यानुसार वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०४. वित्त विभागाच्या दि.२०/४/२०१६ च्या परिपत्रक व त्यासोबतच्या परिशिष्टातील अटी जशाच्या तशा लागू राहतील.

**०५.** या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या अनुदान व कर्ज यासाठीची प्रत्येकी रक्कम रु. १२,२५,५००/- (अक्षरी रुपये बारा लाख पंचवीस हजार फक्त) सर्व संबंधित शेतक-यांना अदा करण्यासाठी प्रस्तुत प्रकरणी लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे यांना "आहरण व संवितरण अधिकारी" व संचालक (प्रशासन), साखर आयुक्तालय, साखर संकुल, पुणे यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यानुसार लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे यांनी त्या-त्या जिल्ह्यातील साखर कारखान्यांना रक्कम आहरित करुन संबंधितांना अदा करण्याची कार्यवाही त्वरीत करावी. सदरची कार्यवाही करताना वित्त विभागाच्या दि. १०.०५.२०१६ रोजीच्या परिपत्रकामध्ये कोषागारात देयक पारित करताना घ्यावयाच्या दक्षतेनुसार कार्यवाही करण्यात यावी. सदर रक्कम बीडीएसवर उपलब्ध करण्यास व खर्च करण्यास वित्त विभागाचे अ.क्र. ३ व ४ येथे नमूद केलेल्या परिपत्रकान्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारांनुसार विहित अटींच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३२७११४००००८०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Deepak S Desai

Digitally signed by Deepak S Desai
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMT Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4d11b2ee4dfa01facc6e58028a3bde93d4ac81d87ed6247ca0fb3a827602426f, cn=Deepak S Desai
Date: 2017.03.27 16:35:08 +05'30'

**( दिपक शि. देसाई )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत:-**

१. मा. मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव
३. मा.प्रधान सचिव (सहकार) यांचे स्वीय सहायक
४. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. सर्व प्रादेशिक सहसंचालक (साखर)
६. महालेखापाल,महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
७. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर.
८. सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२ (कार्यासन विघयो-१)
९. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
१०. वित्त विभाग-व्यय१/अर्थबळ-१३, मंत्रालय, मुंबई
११.कक्ष अधिकारी (१७स, २२स व २५स), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.निवडनस्ती -३स

शासन निर्णय क्र. निधी- २०१७/प्र.क्र. ५८/३स, दिनांक २५.०३.२०१७ चे परिशिष्ट

अनुसूचित जाती/नवबौध्द शेतक-यांना सहकारी साखर कारखान्याचे भाग खरेदीसाठी अनुदान व कर्ज वितरणाबाबतची योजना सन २०६-१७ अंतर्गत जिल्हानिहाय वितरण विवरणपत्र

(रुपये लाखांत)

| अ.क्र. | जिल्हा | अनुदान | कर्ज |
|---|---|---|---|
| १ | नंदूरबार | **१.६५** | **१.६५** |
| २ | जळगाव | **१.६०** | **१.६०** |
| ३ | सोलापूर | **०.०५** | **०.०५** |
| ४ | कोल्हापूर | **३.३७५** | **३.३७५** |
| ५ | औरंगाबाद | **३.०८** | **३.०८** |
| ६ | हिंगोली | **२.५०** | **२.५०** |
| | एकूण | **१२.२५५** | **१२.२५५** |

*************************